**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त वैध मापन शास्त्र यंत्रणेतील विविध संवर्गात पदोन्नती देणेस्तव निवडसूची तयार करण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०१८/प्र.क्र.१४७/ग्रा.सं.-३**
दुसरा माळा, मंत्रालय (विस्तार),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०१८

संदर्भ - १. शासन निर्णय क्र.वैमाआ-१३९०/१०७०/१८२३/ना.पु.चौदा,दि.५ जून,१९९०
२. शासन निर्णय क्र.वैमाशा-१०९५/२०२७/प्र.क्र.३०५८/ना.पु.चौदा, दि.६ ऑक्टोबर,१९९५

**शासन निर्णय :-**

अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखाली नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई तसेच त्यांच्या अधिनस्त विभागीय स्तरावरील वैध मापन शास्त्र कार्यालये येतात.

२. उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या आस्थापनेवरील विविध पदांसाठी उमेदवारांची निवड करण्याकरीता समिती गठीत करण्यात आलेली होती. तद्नंतर संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेतील विविध पदांवर निवड करण्याकरीता निवड समिती पुर्नगठीत करण्यात आलेली आहे. त्यावेळी निरीक्षक या संवर्गाला “गट क” दर्जा होता. शासन निर्णय,दि.९/५/२०१७ अन्वये निरीक्षक, वैध मापन शास्त्र या संवर्गाला “राजपत्रित गट ब” असा दर्जा देण्यात आलेला आहे. सबब, नियंत्रक, वैध मापन शास्त्र यंत्रणेंतर्गत विविध संवर्गातील पदावर पदोन्नती देण्यासाठी निवडसूची तयार करणेस्तव संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ व २ अधिक्रमित करून खालीलप्रमाणे विभागीय पदोन्नती समित्या गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**वैध मापन शास्त्र यंत्रणेतील “ गट- अ” व “गट- ब (राजपत्रित)” संवर्गातील पदांवर पदोन्नती देण्यास्तव विभागीय पदोन्नती समिती**

१. प्रधान सचिव ......... अध्यक्ष
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय
२. नियंत्रक, वैध मापन शास्त्र,महाराष्ट्र राज्य, मुंबई ..........सदस्य
३. अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील(खुद्द) गट-अ ..........सदस्य
मधील अवर सचिव किंवा वरीष्ठ पदावरील मागासवर्गीय अधिकारी
४. उप सचिव/ सह सचिव (ग्रासं - ३) .....सदस्य सचिव
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय

**विभागीय स्तरावरील गट क पदांवर पदोन्नती देण्यासाठी**
**विभागीय पदोन्नती समिती**

१. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य,मुंबई ......... अध्यक्ष
२. सह सचिव/ उप सचिव (ग्रा.सं.-३) ..........सदस्य
३. नियंत्रक,वैध मापन शास्त्र कार्यालयातील गट-अ मधील मागासवर्गीय अधिकारी ..........सदस्य
४. उप नियंत्रक,वैध मापन शास्त्र, मुख्यालय .....सदस्य सचिव

३. उपरोक्त विभागीय पदोन्नती समित्या या आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१८१०२९१५५७५९६२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Dnyandeo Redekar

Digitally signed by Suresh Dnyandeo Redekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b6deeb0e386eb5698cc129016108429cd770a158e87c3a2a96134dccfff610, serialNumber=b0c49d4a2d63d7827dd22b5ccbfc134f691b42353bcee54455b220aff75b429c, cn=Suresh Dnyandeo Redekar
Date: 2018.10.29 16:00:55 +05'30'

**( सु.ज्ञा.रेडेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**
१. नियंत्रक, वैध मापन शास्त्र,महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. समितीतील नियुक्त सदस्य/ सदस्य सचिव
३. प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
४. निवडनस्ती ,( ग्रासं-३)